सन २०१६-१७ च्या टंचाई कालावधीसाठी पाणी टंचाई कार्यक्रमांतर्गत कारंजा रमजानपुर, प्रादेशिक पाणी पुरवठा योजना ता. बाळापूर, जिल्हा अकोला या योजनेच्या विशेष दुरुस्तीच्या प्रस्तावांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१७/प्र.क्र. ३९ /पापु १४**
जी. टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १८ एप्रिल, २०१७

वाचा -

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु १४, दिनांक ३.२. १९९९
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१६/प्र.क्र. १४३/पापु १४, दिनांक ४.५.२०१६
३) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्रमांक उपआ/विकास/पाणी टंचाई /अका कावि/४९०/ १७, दिनांक २३.०३.२०१७ चे पत्र.
४) जिल्हाधिकारी, बुलढाणा यांचे क्रमांक कक्ष ६(४) क.लि. पा.टं./कावि/१७४/२०१७, दिनांक २२.०३.२०१७ चे पत्र.
५) शासन पत्र, क्रमांक टंचाई २०१७/प्र.क्र. ३७/पापु १४, दिनांक १७ एप्रिल, २०१७ (बैठकीचे इतिवृत्त)

प्रस्तावना -

विभागीय आयुक्त, अमरावती यांनी सन २०१६-१७ च्या टंचाई कालावधीसाठी पाणी टंचाई कार्यक्रमांतर्गत कारंजा रमजानपुर, प्रादेशिक पाणी पुरवठा योजना ता. बाळापूर, जिल्हा अकोला या योजनेच्या विशेष दुरुस्तीसाठी रुपये ३७७.७८ लाख इतक्या किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी मिळण्याबाबत प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्ताव सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दिनांक १५ एप्रिल, २०१७ रोजी झालेल्या बैठकीत मान्यतेसाठी विचारात घेण्यात आला.

विभागीय आयुक्त, अमरावती यांच्याकडून प्राप्त झालेल्या कारंजा रमजानपुर, प्रादेशिक पाणी पुरवठा योजना ता. बाळापूर, जिल्हा अकोला या योजनेच्या विशेष दुरुस्तीचा रुपये ३७७.७८ लाख इतक्या किंमतीच्या प्रस्तावावर दि. १५ एप्रिल, २०१७ रोजीच्या स्थायी समितीच्या बैठकीत सविस्तर

चर्चा होऊन प्रस्तावातील प्रस्तावित D I K-७ Pipes व MBR टाकीची दुरुस्ती यास मंजूरी देण्यात आली व अन्य टाक्यांच्या दुरुस्त्या तसेच एक्सप्रेस फिडर या बाबी नामंजूर करण्यात आल्या. तसेच योजनेच्या मंजूर खर्चाच्या २ टक्के याप्रमाणे इतर खर्च व प्रशासकीय /पर्यवेक्षीय इत्यादी शुल्क मंजूर करण्यात आले. त्यानुसार योजनेच्या एकूण रुपये ३,४४,५२,५००/- इतक्या किंमतीच्या प्रस्तावास स्थायी समितीने मंजूरी दिली. त्या अनुषंगाने सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

विभागीय आयुक्त, अमरावती यांनी संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये सादर केलेल्या कारंजा रमजानपुर, प्रादेशिक पाणी पुरवठा योजना ता. बाळापूर, जिल्हा अकोला या योजनेच्या विशेष दुरुस्तीच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने तसेच प्रस्तावनेत नमूद केलेल्या कामांचा समावेश असलेल्या एकूण रुपये ३,४४,५२,५००/- (तीन कोटी चव्वेचाळीस लाख बावन्न हजार पाचशे फक्त ) किंमतीच्या प्रस्तावास स्थायी समितीने दिनांक १५.०४.२०१७ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्या अनुषंगाने कारंजा रमजानपुर, प्रादेशिक पाणी पुरवठा योजना ता. बाळापूर, जिल्हा अकोला या योजनेच्या विशेष दुरुस्तीच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे.

१) जिल्हाधिकारी, अकोला यांनी कारंजा रमजानपुर, प्रादेशिक पाणी पुरवठा योजना ता. बाळापूर, जिल्हा अकोला या योजनेच्या संबंधित प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांच्या क्षेत्रात पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण झाली असल्याचे सर्व प्रथम घोषित करणे.

२) सदर प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांची विशेष दुरुस्तीची कामे कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अकोला यांनी करणे आवश्यक राहील तसेच योजनांची अंमलबजावणी जिल्हा परिषद, अकोला यांच्यामार्फत करण्यात यावी.

३) सदर योजनेचे काम प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे सन २०१६-१७ च्या टंचाई कालावधीच्या आत तातडीने पूर्ण करावे अन्यथा योजनेची मान्यता आपोआपच व्यपगत होईल.

४) सदर योजनेच्या किंमती एवढे रुपये ३,४४,५२,५००/- इतके अनुदान शासनाद्वारे उपलब्ध करुन दिले जाईल.

५) विभागीय आयुक्त, अमरावती यांनी सदर योजनांकरिता योजनांच्या कामाच्या सुरुवातीस ५०% इतका निधी द्यावा. उर्वरित ५०% निधी योजना कार्यान्वित झाल्यानंतर देण्यात यावा.

६) सदर योजनेची प्रस्तावात नमूद कामे जिल्हा परिषद,बुलढाणा मार्फत पूर्ण करण्यात आल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती व योजनेचे व्यवस्थापन संबंधित ग्रामपंचायतींमार्फत करणे आवश्यक राहील.

७) प्रस्तुत योजनेच्या कामास विलंब लागू नये याकरिता एक विशेष बाब म्हणून या योजनेसाठी ७ दिवसाची अल्पावधी ई-निविदा काढण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. याबाबत होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१ - राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च,

(९१)(०१) पिण्याच्या पाण्याच्या आकस्मिक निकडीच्या पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर) - ३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना / उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या सचिवस्तरीय स्थायी समितीच्या दिनांक १५.०४.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१७१४४९३५३१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh
Bhagwan
Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d1f670a17d77c8ddff69694de2a07b7ff855dafef954aefa82ca28bd6cc6adb6, cn=Mahesh Bhagwan Sawant
Date: 2017.04.18 17:48:47 +05'30'

**(म. भ. सावंत)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
८. विभागीय आयुक्त, अमरावती
९. जिल्हाधिकारी,अकोला
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,अकोला
११. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती
१२. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अकोला
१३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१४.उप सचिव (पापु १४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१५.पापु १४ (निवडनस्ती)